<u>केंद्र पुरस्कृत योजना (१०० टक्के)</u>-

**स्वच्छता अभियानांतर्गत *"स्वच्छ ग्राहक मंच"* या केंद्र शासनाच्या योजनेअंतर्गत राज्यातील जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग कार्यालयातील शौचालय बांधकाम/सुधारणा करण्यासाठी निधी उपलब्ध करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/सं.क्र.२१/प्र.क्र.१६/ग्रासं-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- ३० मार्च, २०२२.

<u>वाचा:-</u>

१. केंद्र शासन, उपभोवत मामले एवं खाद्य एवं सावजनिक वितरण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन पत्र क्र. J-२४/९/२०१८-CPU दि.१३.११.२०१८.
२. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र जाक्र./राआ/महा/आस्था/स्व.ग्रा.मं /२०२०/३८४, दि.२१.०१.२०२०.
३. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा/आस्था-२/संकीर्ण/स्वच्छता गृह/२०२०/१०८२, दि.०४.०३.२०२०.
४. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा/आस्था-२/संकीर्ण/स्वच्छता गृह दुरुस्ती/२०२०/२२४९, दि.०९.१२.२०२०.
५. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा/आस्था-२/संकीर्ण/स्वच्छता गृह दुरुस्ती/२०२१/७४१, दि.१७.०२.२०२१.
६. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा/आस्था-२/संकीर्ण/स्वच्छता गृह दुरुस्ती/२०२०/२१४७, दि.२४.११.२०२०.
७. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०१८/सं.क्र.२१/प्र.क्र.१६/ग्रासं-४, दि.१६.११.२०१९ व १५.०३.२०२२.

**<u>प्रस्तावना:-</u>**

स्वच्छता अभियानांतर्गत "स्वच्छ ग्राहक मंच" (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (Clean Consumer Forum) या केंद्रीय योजनेअंतर्गत राज्यातील एकूण ४० जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग कार्यालयातील ३ शौचालयांच्या (१ पुरुषांसाठी, १ स्त्रियांसाठी आणि १ दिव्यांगासाठी) बांधकाम/सुधारणा करण्यासाठी (प्रति शौचालय रु.२५,०००/-) याप्रमाणे प्रत्येक जिल्हा आयोगाकरीता रु.७५,०००/- याप्रमाणे वित्तीय वर्ष सन २०१८-१९ मध्ये एकूण रु.३०.०० लक्ष इतका निधी केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आला होता. सदरचा निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला

असल्याने सदर निधी खर्चास उपलब्ध करण्यासाठी सन २०२०-२१ मध्ये या योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष प्राप्त करण्यात येऊन निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला होता. चालू आर्थिक वर्ष २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात देखील रु.३०.०० लक्ष इतका निधी या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. यापैकी रु.१५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध केलेला आहे.

राज्यातील ४० जिल्हा आयोगाच्या कार्यालयांपैकी ३३ जिल्हा आयोगाच्या कार्यालयांना या योजनेअंतर्गत निधीची आवश्यकता नसल्याची माहिती प्राप्त झालेली असून उर्वरित ७ जिल्हा आयोगांपैकी ४ जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगांचे या कार्यालयाच्या शौचालय बांधकाम/सुधारण करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून एकूण रु.१०,२१,९८८/- इतक्या रक्कमेचा अंदाजपत्रक प्राप्त झाले आहे. त्यामुळे रु.३०.०० लक्ष पैकी प्रत्यक्ष प्राप्त मागणीनुसार रु.१०,२१,९८८/- इतका निधी पुनर्जिवित (revalidate) करणेसाठी केंद्र शासनास दि.१५.०३.२०२२ रोजीच्या पत्रान्वये विनंती करण्यात आली आहे. आता या योजनेअंतर्गत प्रत्यक्ष प्राप्त मागणीनुसार निधी वितरित करण्याची बाब विचाराधिन आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

स्वच्छता अभियानांतर्गत “स्वच्छ ग्राहक मंच” (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (Clean Consumer Forum) या केंद्रीय योजनेअंतर्गत खाली नमूद केलेल्या तक्त्यातील जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या कार्यालयांना खालील विवरणपत्राप्रमाणे यांच्या कार्यालयांतील शौचालय बांधकाम/सुधारण करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त अंदाजपत्रकास मान्यता देण्यात येत असून त्यानुसार निधी वितरण करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **जिल्हा आयोगाचे नांव** | **इमारत** | **सा.बां.विभागाकडून प्राप्त झालेला कामाचे अंदाजित रक्कम** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, उस्मानाबाद | स्वतंत्र इमारत | रु.७५, ०००/- |
| २. | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, हिंगोली | स्वतंत्र इमारत | रु.७५, ०५७/- |
| ३. | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, धुळे | स्वतंत्र इमारत | रु.४,५०,०३०/- |
| ४. | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, मध्य मुंबई | शासकीय इमारत (पुरवठा भवन) | रु.४,२१,९०१/- |
| | **एकूण** | | **रु.१०,२१,९८८/-** |

२.	सदरचा खर्च, मागणी क्रमांक-एम. ५, मुख्य लेखाशिर्ष, ५४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च, ०० (१०२)- नागरी पुरवठा, (००) (०२) स्वच्छ जिल्हा मंच (दत्तमत) (५४७५ ०२९३), ५३, मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर झालेल्या अनुदानातून करण्यात यावा.

३.	या योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने त्यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र व राज्य शासनास सादर करावे. (उपयोगिता प्रमाणपत्राचा नमुना सोबत जोडला आहे)

४.	सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.४.२०१५ च्या शासन निर्णयातील भाग-एक उपविभाग-५ अ.क्र.३, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अन्वये विभागाप्रमुखांना प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०३३०१४१४००९१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b,
pseudonym=6E8363396B2786A7F9280A0F6B79E9C7BC0E7B56,
serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2022.03.30 14:15:34 +05'30'

**( शितल रामटेके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८) अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे स्वीय सहायक
९) सह सचिव, (ग्रा.सं.४) (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) मंत्रालय, मुंबई
१०) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संबंधितांना निधी उपलब्ध करुन देण्याच्या विनंतीसह.
११) प्रबंधक(प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
१२) प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, उस्मानाबाद .

१३) प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, हिंगोली.
१४) प्रबंधक,जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, धुळे.
१५) प्रबंधक,जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, मध्य मुंबई.
१६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद/ हिंगोली/ धुळे/ मध्य मुंबई.
१७) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१८) जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद/ हिंगोली/ धुळे.
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२०) वित्त विभाग (व्यय-१०) मंत्रालय, मुंबई.
२१) निवडनस्ती, ग्रासं-४.

GFR 19-A

(See Rule 212 (1))

Form of Utilization Certificate

| S.No. | Letter No. and Date | Amount (Rs.) | Certified that out of Rs…………. of Grants-in-aids sanctioned during the years………….in favour of ………………under this Ministry/Department letter No.given in the margin and Rs…………on account of unspent balance of the previous year, a sum of Rs…………. has been utilized for the purpose of …………….for which it was sanctioned and that the balance of Rs……….. remaining un utilized at the end of the year has been surrendered to Government (vide No. ……….dated……) will be adjusted towards the grants-in-aid payable during the next year……………. |
|---|---|---|---|
| | | | |
| | Total | | |
| | | | |

1. Certified that I have satisfied myself that the conditions on which the grants-in-aid was sanctioned have been duly fulfilled /are being fulfiled and that I have exercised that following checks to see that the money was actually utilized for the purpose for which it was sanctioned.

kinds of checks exercised.

1. Signature --------------------------
2.
3. Designation ------------------------
4.
5. Date -------------------------------